सुधारित प्रकल्प अहवालास मान्यता देण्याबाबत.
लोकनेते गोपीनाथरावजी मुंडे मागासवर्गीय सहकारी सूतगिरणी मर्या. केज, ता.केज, जि. बीड

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : प्रकल्प १२२३/प्र.क्र.१३/टेक्स१ (ब)**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ०७.०६.२०२३

**वाचा :-**

१)शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्र.सुतगि ११९७/प्र.क्र.१९३/टेक्स-१, दि.२४.३.१९९९
२)शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्र.सुतगि १२००/प्र.क्र.१५३/टेक्स-१, दि.१३.६.२०००
३) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्र.सुतगि११०८/प्र.क्र.९१/टेक्स-१(अ(, दि.३०.६.२०११
४) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्र .सूतगि३३१६/प्र.क्र.८१/टेक्स-१(अ(, दि.१०.७.२०१७
५) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र. धोरण-२०१८/प्र.क्र.१४०१/टेक्स-५, दि.१५.२.२०१८
६) शासन निर्णय सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र .क्र. शाभाभा-१११६/प्र.क्र.१३/टेक्स-१ (ब), दिनांक १७.३.२०१६
७) शासन निर्णय सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र .शाभाभा-१११६/प्र.क्र.१३/टेक्स-१ (ब) , दिनांक ३१.०३.२०१७
८) शासननिर्णय,सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्र. प्रकल्प-१२१३/प्र.क्र.५०/टेक्स-१(अ), दि. १७.०६.२०२१
९) आयुक्त वस्त्रोद्योग,नागपूर यांचे पत्र, दि.१३.०४.२०२३
१०) शासन पत्र क्र.प्रकल्प-१२२२/प्र.क्र.१/टेक्स१ब, दि.३१.०५.२०२३

**प्रस्तावना :-**

लोकनेते गोपीनाथरावजी मुंडे मागासवर्गीय सहकारी सूतगिरणी मर्या. केज, ता.केज, जि. बीड या सूतगिरणीची बाराव्या पंचवार्षिक योजना काळात शासन निर्णय दि.१८ नोव्हेंबर २०१५ नुसार शासकीय अर्थसहाय्यासाठी निवड करण्यात आलेली आहे. शासन निर्णय दि.३० जानेवारी, २०१६ नूसार सूतगिरणीच्या रू.६१७४.२४ लाखाचा प्रकल्प अहवालास मंजूरी प्राप्त आहे. सूतगिरणीने रू.३०४.५६ लाख सभासद भागभांडवल जमा केलेले आहे. सूतगिरणीस आतापर्यंत शासन निर्णय दि.१७.०३.२०१६ व दि.३१.०३.२०१७ अन्वये एकूण रू.२७४१.०४ लाख इतके शासकीय भागभांडवल अदा करण्यात आलेले आहे. या विभागाचे शासन निर्णय दि.१७.०६.२०२१ अन्वये, सहकारी सूतगिरणीची प्रकल्प किंमत रु.६१.७४ कोटी वरुन रु.८०.९० कोटी इतकी निश्चित करण्यात आली आहे. यशासन निर्णयातील तरतुदीनुसार, शासनाने यापूर्वी अर्थसहाय्य केलेल्या आठव्या, दहाव्या व बाराव्या पंचवार्षिक योजना काळातील ज्या सहकारी सूतगिरण्यांचे प्रकल्प पूर्ण क्षमतेने सुरु झालेले नाहीत, अशा सहकारी सूतगिरण्यांना देखील प्रो-रेटा पध्दतीने रु.८०.९० कोटी ही सुधारित प्रकल्प किंमत लागू करण्यात आली आहे. दि.१३.०३.२०२३ च्या शासन निर्णयान्वये सहकारी सूतगिरण्यांची प्रकल्प अहवाल किंमत रु.८०.९० कोटी इतक्या मर्यादेत प्रो-रेटा पद्धतीने निश्चित करणेसाठी कार्यपद्धती विहित

करण्यात आलेली आहे. सदर शासन निर्णयास अनुसरून आयुक्त (वस्त्रोद्योग) यांनी दि.१३.०४.२०२३ च्या पत्रान्वये सदर सूतगिरणीचा रु.७३७५.०६ लाख किंमतीचा सुधारित प्रकल्प अहवाल शासन निर्णयार्थ सादर केला आहे. राज्यातील सहकारी सूतगिरण्यांच्या प्रकल्प अहवाल मंजूरीसाठी दि.१३.०६.२००० रोजीच्या शासन निर्णयान्वये मा.मंत्री (वस्त्रोद्योग) यांच्या अध्यक्षतेखाली सुकाणू समिती गठित करण्यात आली आहे. सदर शासन निर्णयास अनुसरून सुकाणू समितीच्या दिनांक २९.०५.२०२३ रोजी झालेल्या बैठकीत लोकनेते गोपीनाथरावजी मुंडे मागासवर्गीय सहकारी सूतगिरणी मर्या. केज, ता.केज, जि. बीड या सूतगिरणीच्या प्रकल्प अहवालात दर्शविलेल्या किंमतीबाबत चर्चा करुन आयुक्त, वस्त्रोद्योग, नागपूर यांनी प्रो-रेटानुसार या सूतगिरणीच्या ५:४५:५० या आकृतीबंधानुसार प्रस्तावित केलेल्या रु.७३७५.०६ लाख किंमतीच्या सुधारीत प्रकल्प अहवालास मान्यता देण्यात आली आहे. त्याअनुषंगाने लोकनेते गोपीनाथरावजी मुंडे मागासवर्गीय सहकारी सूतगिरणी मर्या. केज, ता.केज, जि. बीड या सूत गिरणीच्या रु.७३७५.०६ लाख एवढ्या प्रकल्प किंमतीस मंजूरी देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

वरील प्रस्तावनेमध्ये नमुद केल्यानुसार, लोकनेते गोपीनाथरावजी मुंडे मागासवर्गीय सहकारी सूतगिरणी मर्या. केज, ता.केज, जि. बीड या सूतगिरणीची सध्याची रु.६१७४.२४ लाख रक्कमेची प्रकल्प किंमत रु.८०९०.०० लाख किंमतीच्या मर्यादेत प्रो-रेटा नुसार रु.७३७५.०६ लाख इतक्या रक्कमेच्या सुधारित प्रकल्प किंमतीस, त्या त्या बाबींसाठी मंजूर कमाल मर्यादेपेक्षा जास्त होणारा खर्च सूतगिरणी स्वनिधी उभारुन करेल या अटीवर तसेच खालील अटीच्या अधीन राहून शासन मान्यता देण्यात येत आहे -

"सूतगिरणीने स्वतः उभारावयाचे सभासद भागभांडवल, शासनाकडून उपलब्ध झालेले भागभांडवल व प्रकल्प किंमतीच्या ५०% कर्जाची रक्कम पूर्णपणे खर्च झाल्याचे उपयोगिता प्रमाणपत्र प्राप्त झाल्यानंतरच सूतगिरणीस वाढीव प्रकल्प किंमतीनुसार देय असलेले शासकीय भागभांडवल मंजूर करण्यात येईल."

२. सदर सुतगिरणीवर खालील बाबी बंधनकारक राहतील:-

१) सूतगिरणीच्या कामासाठी कालबध्द कार्यक्रम (Time bound Program) आखून घ्यावा व त्यानुसार सूतगिरणीची उभारणी विहित कालावधीत करावी.

२) शासन निर्णय दि.२४.३.१९९९ मधील सूतगिरणी परतफेडीस पात्र होण्याबाबतच्या अटीमध्ये दि.१०.०७.२०१७ च्या शासन निर्णयान्वये सुधारणा करण्यात आली असून सदरची सुधारणा या सूतगिरणीसाठी बंधनकारक राहील.

३) सूतगिरणीस निधी उभा करण्यासाठी कोणती बँक कर्ज देणार आहे, त्या बँकेचे कर्ज मंजूर करण्यात येत असल्याबाबतचे पत्र सादर करावे.

४) सूतगिरणीच्या कामकाजावर व प्रकल्प उभारणीवर लक्ष देऊन त्याबाबतचा तिमाही प्रगती अहवाल आयुक्त वस्त्रोद्योग, नागपूर यांनी विहित विवरणपत्रात शासनास सादर करावा.

५) सूतगिरणीचा प्रकल्प एक पथदर्शक प्रकल्प म्हणून उभा राहील याबाबत सूतगिरणीने तसेच आयुक्त वस्त्रोद्योग, नागपूर यांनी दक्षता घ्यावी.

६) सदर सूतगिरणी मागास प्रवर्गातील असल्याने शासनाने भविष्यात काही अटी/शर्ती घातल्यास त्या या सूतगिरणीवर बंधनकारक असतील.

(७) दि.१७ ऑक्टोबर, २०१६ रोजीच्या राजपत्रान्वये राज्यातील सहकारी संस्थांवर दोन शासकीय सदस्य नेमण्याच्या अनुषंगाने महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम, १९६० मध्ये सुधारणा करण्यात आली असून सदर निर्णय या सूतगिरणीस बंधनकारक राहील.

३. लोकनेते गोपीनाथरावजी मुंडे मागासवर्गीय सहकारी सूतगिरणी मर्या. केज, ता.केज, जि. बीड या सूतगिरणीचे सभासद भागभांडवल व शासकीय भागभांडवल यांचे प्रमाण १:९ असे राहील .त्यानुसार सूतगिरणीने पुढीलप्रमाणे निधी उपलब्ध करावयाचा आहे:-

(रु. लाखात)

| | | |
|---|---|---|
| अ) | सभासद भागभांडवल ५% | ३६८.७५ |
| ब) | शासकीय भागभांडवल ४५% | ३३१८.७८ |
| क) | दीर्घ मुदती कर्ज ५०% | ३६८७.५३ |
| | **एकूण** | **७३७५.०६** |

सदर सूतगिरणीचा प्रकल्प किंमतीचा बाबनिहाय तरतुदीचा तपशील खालीलप्रमाणे राहील व त्या मर्यादेत गिरणीने खर्च करणे गिरणीस बंधनकारक राहील:-

| अ. क्र. | तपशिल | प्रकल्प अहवालानुसार बाबनिहाय मंजूर खर्च (रु.लाखात) |
|---|---|---|
| १ | जमीन व जमीन सुधारणा | ७७.४८ |
| २ | फॅक्टरी इमारत व इतर बांधकाम | १४०१.०७ |
| ३ | प्लँट अँड मशिनरी | ४०६७.२९ |
| ४ | इतर कायम मालमत्ता | ७९९.९० |
| ५ | स्टोअर्स व स्पेअर्स | ८८.८७ |
| ६ | मार्जीन मनी | ४११.१२ |
| ७ | प्रिऑपरेटिव्ह खर्च | १८५.०० |
| ८ | कॉन्टीजंसी | ३४४.३३ |
| | **एकूण** | **७३७५.०६** |

४. सूतगिरणीने रु.७३७५.०६ लाख इतक्या किंमतीमध्ये प्रकल्पाची उभारणी पूर्ण करावी .शासनाकडून देय भागभांडवलाची रक्कम निधीच्या उपलब्धतेप्रमाणे देण्यात येईल .प्रकल्प पूर्ण करण्यासाठी वरीलप्रमाणे त्या त्या प्रयोजनासाठी मंजूर किंमतीपेक्षा जास्त रक्कम खर्च झाल्यास जास्तीची रक्कम सूतगिरणीने स्वनिधीतून उभी करणे आवश्यक राहील .प्रकल्पावर अतिरिक्त होणारा खर्च सूतगिरणीला स्वत :करावा लागेल.तसेच यंत्रसामुग्री खरेदी व स्थापत्य बांधकामासाठी शासन निर्णय दि.१५.६.२००६ व दि.२८.३.२०१८ नुसार मान्यता घ्यावी .गिरणीच्या संचालक मंडळाने गिरणीच्या खर्चावर कडक नियंत्रण ठेवावे व अनावश्यक खर्च टाळावा.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०६०७१८३१५६४२०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने.

PRASENJEET D KARLEKAR

Digitally signed by PRASENJEET D KARLEKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT, 2.5.4.20=d219c43caa42a6d2c11a62256b2ff3ad939a420c9fb6fa0cb24c384214bcee8c, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=58B95820309E7F466AE2AD722C14D2E8910FE2F9D499461E1829267B19AB9CFC, cn=PRASENJEET D KARLEKAR
Date: 2023.06.07 18:35:05 +05'30'

**(प्रसेनजीत कारलेकर)**

**कक्ष अधिकारी , महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
२. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
३. सचिव (वस्त्रोद्योग), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
४. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.
५. आयुक्त वस्त्रोद्योग, वस्त्रोद्योग संचालनालय, महाराष्ट्र राज्य, नागपूर.
६. जिल्हाधिकारी, बीड
७. प्रादेशिक उप आयुक्त, वस्त्रोद्योग, औरंगाबाद.
८. जिल्हा उप निबंधक, सहकारी संस्था, बीड.
९. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी वस्त्रोद्योग महासंघ, मुंबई
१०. कार्यासन अधिकारी १६-स /अवर सचिव,१७-स, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
११. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई) २ प्रतीत(
१२. अध्यक्ष, लोकनेते गोपीनाथरावजी मुंडे मागासवर्गीय सहकारी सूतगिरणी मर्या. केज, ता.केज, जि. बीड (आयुक्त वस्त्रोद्योग यांचे मार्फत)
१३. निवडनस्ती, टेक्स-१(ब) /टेक्स-१ (अ).